**<u>महाराष्ट्र राज्य लॉटरी</u>**
**महाराष्ट्र दिवाळी भव्यतम या सोडतीची**
**बक्षिसरचना व कार्यपध्दतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक शुध्दीपत्रक क्रमांकः मरालॉ २०२०/प्र.क्र. ६८/लॉटरी-२**
नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २८ ऑक्टोबर,२०२०.

<u>वाचा</u> : वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः मरालॉ २०२०/प्र.क्र. ६८/लॉटरी २, दि.०८/१०/२०२०.

**<u>शासन परिपत्रक</u> शुध्दीपत्रक :**

महाराष्ट्र दिवाळी भव्यतम या सोडतीची बक्षिस रचना व कार्यपध्दती दि.०८/१०/२०२० च्या शासन परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आलेली आहे. सदर शासन परिपत्रकातील परिच्छेद -३ तसेच परिच्छेद -८, परिच्छेद- ८(१), ८(२) व ८(३) ऐवजी पुढील प्रमाणे वाचण्यात यावे.

**परिच्छेद -३ :-** महाराष्ट्र दिवाळी भव्यतम " या सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि. व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, १ ला मजला, वाय-अे १, अतिरिक्त शॉप कम गोडाऊन, ए.पी.एम.सी. मार्केट,सेक्टर १९-बी, वाशी,नवीमुंबई-४००७०५ यांचे कार्यालयातून सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील. या भव्यतम सोडतीची तिकीट विक्री फक्त महाराष्ट्र राज्यातच करण्यात येईल. तसे तिकीटांवर छापण्यात येईल.

**परिच्छेद -८. सोडतीची कार्यपध्दती :-**

**महाराष्ट्र दिवाळी भव्यतम सोडत** या सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ६ ड्रम्स ठेवले जातील. प्रत्येक मालिकेमध्ये ००००० ते ९९९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकांचे अद्याक्षरे/क्रमांक असतील. दुसऱ्या ड्रममध्ये ० ते ९ क्रमांकाच्या चकत्या असतील व उर्वरित ४ ड्रम्समध्ये ० ते ९ अंकाची प्रत्येकी एक चकती याप्रमाणे १० चकत्या ठेवण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील.

**परिच्छेद -८ (१) <u>दुसरे बक्षिस रू. ५,००,०००/-</u>** दुसऱ्या रु. ५,००,०००/- च्या बक्षिसासाठी ५ ड्रम मधून पूर्ण अंकाचा १ भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या काढण्यात येईल.

**परिच्छेद -८ (२) <u>तिसरे बक्षिस रू. १,००,०००/-</u>** तिसऱ्या रु.१,००,००० च्या बक्षिसासाठी ५ ड्रम मधून पूर्ण अंकाचे २ भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. असे काढण्यात आलेले क्रमांक व त्या त्या मालिकेतील रू.१,००,०००/-च्या तिसऱ्या बक्षीसासाठी पात्र असतील.

**परिच्छेद -८ (३) <u>चौथे बक्षिस रू. १०,०००/-</u>** चौथ्या रु. १०,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून शेवटच्या ४ अंकाचा १ भाग्यवान क्रमांक याप्रमाणे प्रत्यके मालिकेसाठी स्वतंत्ररित्या एक क्रमांक काढण्यात येईल. ज्या तिकीटांच्या शेवटी असा क्रमांक असेल अशी त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू.१०,०००/-च्या चौथ्या बक्षिसाठी पात्र असतील.

सदर शासन परिपत्रक शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२०१०२८१५१८३०४६०५ असा आहे. हे शासन परिपत्रक शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tanaji Raghunath Pawar

Digitally signed by Tanaji Raghunath Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9fb5ee9e082c5be972b251ab6848d0c9186e8961bdfcbf9861251eb62d191d6c, cn=Tanaji Raghunath Pawar
Date: 2020.10.28 15:23:19 +05'30'

**( ता. र. पवार )**
**कक्ष अधिकारी तथा**
**राज्य लॉटरी अधिकारी, वित्त विभाग.**

**प्रति,**

१. मा. मंत्री ( वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, (गृह),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, राज्य लॉटरी,वित्त विभाग, मुंबई-३२.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२.
११. सह सचिव (राज्य लॉटरी) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय,वाशी, नवीमुंबई.
१५. कक्ष अधिकारी, प्रशा-४/लॉटरी-३/ अर्थोपाय,/ लेखाधिकारी (लॉटरी संचालनालय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती, लॉटरी -२.